सन २०१३-१४ या आर्थिक वर्षासाठी मा. लोक प्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील गावांतर्गत रस्ते, गटारे व अन्य मुलभूत सुविधांच्या कामांसाठी **अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांना निधी खर्च करण्यास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

ग्रामविकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय क्रमांकः विकास-२०१४/प्र.क्र.३४/यो-६

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.

दिनांक : ०३/०३/२०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रा.वि.व.ज.सं.वि.क्र.विकास-२०१३/प्र.क्र.२३६/यो-६,दिनांक ०२/११/२०१३, २१/११/२०१३, ३०/१२/२०१३, ०४/०१/२०१४, २१/०२/२०१४, ०३/०३/२०१४ व ०४/०३/२०१४.

२) **शासन निर्णय क्रमांकः** विकास-२०१४/प्र.क्र.३४/यो-६ दि.०४/०३/२०१४.

३) **शासन निर्णय क्रमांकः** विकास-२०१४/प्र.क्र.३४/यो-६ दि. २६/०३/२०१४

**शासन निर्णय-**

सन २०१३-१४ या वित्तीय वर्षासाठी मा. लोकप्रतिनिधीनी सूचविलेल्या ग्रामीण भागातील रस्ते गटारे व अन्य मुलभूत सुविधांच्या कामासाठी मंजूर करण्यात आलेल्या विशेष निधीमधून संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार जिल्हानिहाय कामे मंजूर करण्यात आली आहेत. तसेच कामनिहाय मंजूर रक्कमेच्या ८०% प्रमाणे निधी संबंधीत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांना वितरित करण्यास संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांना वितरित करण्यात आलेला निधी ठेव अंशदान स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत “ मुख्य लेखाशीर्ष ८४४३” या लेखाशीर्षाखाली वर्ग करण्यास मान्यता देण्यात आली असून सदर निधी दि. ३० सप्टेंबर २०१४ अखेर खर्च करण्याची कालमर्यादा ठरवून देण्यात आली होती. तथापि, काही कामे दि. ३० सप्टेंबर २०१४ नंतर पूर्ण झाल्यामुळे सदर कामांची देयके अदा करण्यास अडचणी येत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयामधील परि. क्र. ३ मध्ये नमूद करण्यात आलेला निधी दि. ३१ मार्च २०१५ पर्यंत खर्च करण्यास या शासन निर्णायाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

२.	अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी सन २०१३-१४ मध्ये संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मंजूर कामांपैकी पूर्ण झालेल्या कामांची देयके अदा करण्यात यावीत तसेच दि. ३१ मार्च २०१५ अखेर शिल्लक निधी शासन कोषागारात जमा करुन महालेखापाल यांना कळविण्यात यावे व त्याची प्रत शासनास पाठविण्यात यावी. दि. ३१ मार्च २०१५ नंतर निधी खर्च करण्यास मुदतवाढ देण्यात येणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०३१५३५४९८७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NandKumar Mahadeo Shinde

Digitally signed by NandKumar Mahadeo Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=NandKumar Mahadeo Shinde
Date: 2015.03.03 16:33:02 +05'30'

(नं.म.शिंदे)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, ग्रा.वि यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा.राज्यमंत्री, ग्रा .वि. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
३. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल, लेखा परिक्षा, १/२, महाराष्ट्र, मुंबई.
५. सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/पुणे/नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
८. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
९. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११.निवड नस्ती यो-६ कार्यासन, ग्राम विकास व जलसंधारण विभाग बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.